**राज्यातील नगरपरिषदांमध्ये आवश्यक असलेले अग्निशमन अधिकारी/ कर्मचारी यांची भरती करणेसाठी आस्थापना खर्चाची अट विशेष बाब म्हणून शिथील करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः एमसीओ २०१४/प्र.क्र. १८५/नवि १४

मादम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**तारीख: ०९ सप्टेंबर, २०१४**

वाचा :-

१) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्रमांक संकीर्ण १०९९/२९४/प्र.क्र ७८/२०००/ नवि २७, दि. २८.०९.२००००

२) संचालक, अग्निशमन सेवा संचालनालय यांचे पत्र क्र. मअसे/३२-एफ/ २०१३/ १८३०, दि. ०७.१२.२०१३

३) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे पत्र क्र. नपप्रस/ आस्थापना खर्च धोरण/सं-३८३५/२०११/का-६, दिनांक १६.०१.२०१४ व समक्रमांक दिनांक २०.०२.२०१४ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्रातील नगरपरिषदांमध्ये अग्निशमन सेवा अत्यावश्यक करण्यात येऊन त्या सेवेसाठी आवश्यक कर्मचारी संख्या शासनाकडून मान्य करण्यात आली आहे. नगरपरिषद कर्मचारी भरतीकरीता मर्यादा असलेल्या आस्थापना खर्चाच्या अटीमुळे नगरपरिषद अग्निशमन सेवा अधिकारी/ कर्मचारी भरती करण्यास असमर्थ ठरत आहेत. त्यामुळे भविष्यात यंत्रणा असूनही कर्मचाऱ्यांअभावी समस्या निर्माण होण्याची शक्यता असल्यामुळे प्रत्येक नगरपरिषदेकरीता अग्निशमन सेवेसाठी आवश्यक असलेला अधिकारी/ कर्मचारी भरती करण्यासाठी विशेष बाब म्हणून आस्थापना खर्चाची अट शिथील करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

वरील सर्व बाबींचा साकल्याने विचार करुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

नगरपरिषद प्रशासन संचालनालयाकडून मंजुर करण्यात आलेल्या आकृतीबंधाच्या मर्यादेत अग्निशमन अधिकारी /कर्मचारी यांची भरती करण्यासाठी संदर्भ क्र. १ अन्वये विहित करण्यात आलेली आस्थापना खर्चाची अट शिथील करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१४०४२९९३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: CN = Milind Raghunath Kulkarni, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = UDD
Date: 2014.09.09 14:37:10 +05'30'

**(मिलिंद कुळकर्णी)**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत,

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
२. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक
३. सर्व जिल्हाधिकारी
४. संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, विद्यानगरी, हंस भुग्रा मार्ग, सांताक्रुझ (पूर्व), मुंबई -९८.
५. सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद/ नगरपंचायत
६. नगर विकास विभागातील सर्व कार्यासने
७. निवड नस्ती/ नवि १४